अभियोग संचालनालयाच्या आस्थापनेवरील अतिरिक्त सरकारी अभियोक्ता गट-अ यांच्या वार्षिक सर्वसाधारण बदल्या-२०२३

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः डीपीपी-०५२३/प्र.क्र.९३/पोल-१०**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २८ जून,२०२३

**वाचा :-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बदली २०२३/प्र.क्र.३२/कार्या-१२ दि.३०.०५.२०२३

**शासन आदेश :-** महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (३) मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेनुसार अतिरिक्त सरकारी अभियोक्ता, गट अ या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांच्या बदल्या त्यांच्या नावासमोरील स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे जिल्हयातील नियुक्तीचे ठिकाण | बदलीने नियुक्तीने जिल्हयाचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. आनंद विष्णु नरखेडकर | अहमदनगर | सोलापूर |
| २. | श्री. दिलीप पोपटराव बहिरम | मुंबई | रायगड |
| ३. | श्री. केशव यादव साळुंके | पालघर, जि. ठाणे | बृहन्मुबई |

२. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अतिरिक्त सरकारी अभियोक्त्यांनी बदली नंतरच्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा. बदली आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता संचालक, अभियोग संचालनालय यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

अ) अतिरिक्त सरकारी अभियोक्ता संवर्गातील बदलीसाठी जिल्हा प्रस्तावित करण्यात आला असून जिल्हयांतर्गत पदस्थापना संचालक, अभियोग संचालनालय यांनी करावी.

ब) बदलीबाबतच आदेश प्राप्त झाल्यांनतर बदली झालेले अतिरिक्त सरकारी अभियोक्ता त्यांच्या सध्याच्या पदावरुन कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना नियंत्रण अधिकारी यांनी विनाविलंब रुजू करुन घ्यावे. सदर अभियोक्त्याला रुजू करुन न घेतल्यामुळे काम न

देता सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरवून वेतन व भत्त देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधीत अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

३. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अतिरिक्त सरकारी अभियोक्त्यांने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अभियोक्तयाविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

४. संबंधित अतिरिक्त सरकारी अभियोक्त्यांच्या बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अनुपालन अहवाल संबंधित सहायक संचालक व सरकारी अभियोक्ता यांनी संचालक, अभियोग संचालनालय यांच्यामार्फत शासनास न चुकता सादर करावा. तसेच संचालक, अभियोग संचालनालय यांनी संबंधित अभियोक्त्यांच्या बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा एकत्रित अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२८२१४३०१३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.06.28 22:02:54 +05'30'

**(कैलास गायकवाड )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (अ. व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मत्रालय, मुंबई.
६. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
११. संबंधित अतिरिक्त सरकारी अभियोक्ता (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत)
१२. निवडनस्ती (पोल-१०)